**दि चिल्ड्रेन्स एड् सोसायटी, मुंबई या संस्थेच्या निरीक्षणगृह/बालगृह, उमरखाडी या संस्थेच्या आवारातील स्थापत्यविषयक दुरूस्तीच्या ९ कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः चिएसो-२०२४/प्र.क्र.३६/का-८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक-१६ मार्च, २०२४.

वाचा :-

१. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र-विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दि.२०/९/२०१९
२. सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन परिपत्रक क्र-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५/९/२०१९
३. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई, सार्वजनिक बांधकाम विभाग, वरळी, मुंबई यांचे पत्र क्र.का.अ./ममुंवि/प्रशा/९४६ दि.१३/०२/२०२४

**प्रस्तावना**

दि चिल्ड्रेन्स एड् सोसायटी, मुंबई या संस्थेची स्थापना सन १९२७ साली तत्कालीन ब्रिटीश सरकारने बॉम्बे चिल्ड्रेन्स ॲक्ट १९२४ कायद्याच्या अंमलबजावणी करीता व मुंबई मध्ये अनाथ, निराधार, उपेक्षित, भिक्षेकरी मुलांच्या संगोपनाकरीता करण्यात आली आहे. या संस्थेच्या निरीक्षणगृह/बालगृह, उमरखाडी येथील इमारतींची दुरुस्ती व नुतनीकरणाची कामे करण्याबाबत मा.न्यायमुर्ती रेवती डेरे, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.०६.०५.२०२३ रोजी सदर संस्थेस दिलेल्या भेटीदरम्यान तोंडी सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम अभियंता, वरळी, मुंबई यांनी वाचा क्र.३ अन्वये सादर केलेल्या स्थापत्य विषयक दुरुस्तीच्या ९ बांधकामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दि चिल्ड्रेन्स एड् सोसायटी, मुंबई निरीक्षणगृह/बालगृह, उमरखाडी येथील ईमारत बांधकाम व दुरूस्तीच्या ₹३,०६,६२,८९०/- (अक्षरी तीन कोटी सहा लक्ष बासष्ट हजार आठशे नव्वद) इतक्या रक्कमेच्या खालील विवरणपत्रातील स्थापत्य विषयक दुरुस्तीच्या ९ बांधकामांच्या अंदाजपत्रकांना या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | Renoavtion of Temple Area and MT Roof in Front of Main Building at Children Home, Umarkhadi, Dongri, Mumbai. | ₹३४,०७,९१०-/ |
| २ | Renovation of Common Toilet and Drainage Line at Girls Section, Umarkhadi, Mumbai. | ₹३०,००,६७८-/ |
| ३ | Connection of Pipeline for Girls Section, Children Home, Umarkhadi, Mumbai. | ₹८,९२,२९८-/ |
| ४ | Wall Painting and Art Work Beautification at Children Home, Umarkhadi, Mumbai. | २०₹,२५,२२५/- |
| ५ | Beautification of Temple Area Near Open Gym Boys Section at Children Home, Umarkhadi, Dongri, Mumbai. | ₹२५,५०,६२३-/ |
| ६ | Renovation of Toilet block and Making of Changing Room at Boys Section, Children Home, Umarkhadi, Mumbai. | ₹२५,२८,३८६-/ |
| ७ | Providing M.T Roof to Gilrs Section Main Building at Chilldren Home, Umarkhadi, Dongri, Mumbai. | ₹१,०८,७३,१५९-/ |
| ८ | Beautification, Landscaping and Construction of Open Gym at Girls section, Umarkhadi, Mumbai | ₹४१,९०,४४५-/ |
| ९ | Construction of Gazebo at Girls section, Children Home, Umarkhadi, Mumbai | ₹११,९४,१६६-/ |
| | **एकूण** | **₹३,०६,६२,८९०/-** |

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दि.२०/९/२०१९ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५, अनुक्रमांक ३ व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर बाबीवर होणारा खर्च मागणी क्र. एक्स-३, ०२, समाज कल्याण, १०२, बाल कल्याण ४२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च (००)(०१) मोठी बांधकामे कार्यक्रम, ५३, मोठी बांधकामे (४२३५-०२०६) या लेखाशिर्षांतर्गत व इतर खर्च (००)(०२) आस्थापना खर्च कार्यक्रम ६३, आंतरलेखा हस्तांतरणे (४२३५-०२१५) व (००)(०३) हत्यारे व संयंत्रे कार्यक्रम ६३, आंतरलेखा हस्तांतरणे (४२३५-०२२४) या लेखाशिर्षातर्गत अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१६११०५४७७४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NILESH JANARDAN PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2024.03.16 11:39:47 +05'30'

**(डॉ.निलेश ज. पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
७. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१०. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१२. सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१४. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई व मुंबई उपनगर
१६. मुख्याधिकारी, दि चिल्ड्रेन्स एड् सोसायटी, मुंबई
१७. निवड नस्ती, का-०८.